शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथील परिसरात रुग्णसेवेच्या दृष्टीने ८ प्रतिक्षा कक्षाचे बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएन-२०२४/प्र.क्र.२९४/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०८ मे, २०२४

**वाचा :**
१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/ शावैमवरु नागपूर /८ नं. प्रतिक्षा कक्ष /३१००/आय-प/२०२४, दिनांक ०७.०३.२०२४.
२) भारत निवडणूक आयोग File No.437/MH-HP/2024(cVigil)/WS-II, दिनांक : ०८.०५.२०२४.

**शासन निर्णय :**

मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल याचिका क्र. CIVIL APPLICATION NO.522 OF 2024 IN SUO MOTU PUBLIC INTEREST LITIGATION No.1 of 2023, C.H.Sharma & ORS Vs State of Maharashtra अन्वये दिनांक ०२.०५.२०२४ व दिनांक ०८.०५.२०२४ रोजी न्यायालयीन प्रकरणी दिलेल्या आदेशानुसार तसेच भारतीय निवडणूक आयोग, नवी दिल्ली यांनी त्यांच्या दिनांक ०८.०५.२०२४ रोजी दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथील परिसरात रुग्णसेवेच्या दृष्टीने ८ प्रतिक्षा कक्षाचे बांधकाम करण्यासाठी रुपये १३,३७,५६,६०१/- (रुपये तेरा कोटी, सदतीस लक्ष, छपन्न हजार, सहाशे एक फक्त) (वस्तु व सेवा करांसहीत) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत (वस्तु व सेवा करांसहीत) |
|---|---|---|
| १ | Construction of 8 No Waiting Room in the premises of Government Medical College & Hospital, Nagpur | १३,३७,५६,६०१ |
| | एकूण | १३,३७,५६,६०१ |

<u>अटी</u> :-

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक -२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५०८१८१४२३६२१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH BABAN SURWASE

Digitally signed by PRAKASH BABAN SURWASE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=PRAKASH BABAN SURWASE
Date: 2024.05.08 18:41:28 +05'30'

**( प्रकाश सुरवसे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि. ), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. निवडनस्ती (प्रशा-१).